**अनुसूचित जातीच्या मुलामुलींना <u>शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजना</u> सन २०१६-१७ साठी विद्यार्थ्यांची निवड करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इबीसी २०१६/प्र.क्र. ३४४/शिक्षण-१

मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
तारीख: १३ डिसेंबर,२०१६

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२००३/प्र.क्र.११५/मावक-२,दिनांक ११.०६.२००३

२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२०१०/प्र.क्र.१९४/मावक-२,दिनांक १५.०७.२०१०

३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२०१०/प्र.क्र.१९४/ मावक-२,दिनांक २२.१०.२०१०

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२०१३/प्र.क्र.१४१/ शिक्षण-१,दिनांक ०८.०८.२०१३ व २८.११.२०१३

५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२०१४/प्र.क्र.८२/ शिक्षण-१,दिनांक १२.०९.२०१४

६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी२०१५/प्र.क्र.६९/ शिक्षण-१,दिनांक १६.०६.२०१५

७) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी२०१५/प्र.क्र.१४०/ शिक्षण-१,दिनांक ३०.१०.२०१५

८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागकमांक: इबीसी२०१५/प्र.क्र.१४०/ शिक्षण-१,दिनांक २४.११.२०१५

९) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: इबीसी२०१५/प्र.क्र.९१/ शिक्षण-१,दिनांक २६.०४.२०१६

१०) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: इबीसी २०१६/प्र.क्र.२८२/ शिक्षण-१,दिनांक ०८.०७.२०१६

११) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे पत्र क्र.सकआ/शिक्षण/परदेश शिष्यवृत्ती/ २०१६-१७/पुणे/२५५३, दिनांक ०८.०७.२०१६

१२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: इबीसी २०१६/प्र.क्र.३४४ / शिक्षण-१,दिनांक १६.०७.२०१६

१३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: इबीसी २०१६/प्र.क्र.३४४/ शिक्षण-१,दिनांक २६.०७.२०१६

१४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: इबीसी २०१६/प्र.क्र.४२६/ शिक्षण-१,दिनांक २९.०९.२०१६

१५) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचा दिनांक २७.०९.२०१६ रोजीचा प्रस्ताव

## प्रस्तावना :-

शासन निर्णय दिनांक ११.०६.२००३ अन्वये अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी, याकरिता परदेशी शिष्यवृत्ती योजना लागू केली आहे. सदर योजनेमध्ये कालानुरुप वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत.

सन २०१६-१७ या वर्षाकरिता ज्या विद्यार्थ्यांचे परदेशी विद्यापीठांचे वर्ल्ड रँकिंग QS Universities World Ranking १ ते ३०० मध्ये आहे, अशा नामांकित विद्यापीठातील विविध शाखांमध्ये सन २०१६-१७ मध्ये प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांपैकी यापूर्वी ४९ विद्यार्थ्यांची परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेली आहे. सन २०१६-१७ मध्ये प्राप्त झालेल्या अर्जापैकी संदर्भाधिन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांच्या दिनांक २७.०९.२०१६ रोजीच्या प्रस्तावातील पात्र २३ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

अनुसचित जातीतील विद्यार्थ्यांना परदेशातील शिष्यवृत्ती योजनंतर्गत सन २०१६-१७ या वर्षाकरिता ५० विद्यार्थ्यांची संख्या वाढवून ती ७५ इतकी करण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २९.०९.२०१६ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजनेतंर्गत यापूर्वी, सन २०१६ -२०१७ या वर्षाकरीता एकुण ४९ विद्यार्थ्यांची परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेली आहे. आता, संदर्भीत शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता करणा-या एकूण २३ विद्यार्थ्यांना ( पीएच.डी अभ्यासक्रमासाठी ०२ व पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमासाठी २१) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार निवड समितीने मान्यता दिल्याप्रमाणे परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येत आहे. सदर विद्यार्थ्यांची निवड यादी परिशिष्ट-“अ” व “ब” सोबत जोडलेल्या जोडली आहे.

२. सदरहू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर विद्यार्थ्यांची त्यांच्या अभ्यासक्रम पुर्ण होण्यासाठी नमूद असलेल्या कालावधीपर्यंतची शिष्यवृत्ती मंजूर करण्याची, तसेच विद्यार्थ्यांचे

परदेशातील शिक्षण चालु असल्याच्या कालावधीत एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास त्याबाबत शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे अधिकार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना देण्यात येत आहेत.

३. ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे व त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्याकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी हमीपत्र (BOND) लिहून घेणे बंधनकारक राहील.

४. परेदशात वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेली संस्था भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे किंवा वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी परदेशात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनी भारतात पदवी / पद्व्युत्तर पदवी घेऊन परत आल्यानंतर भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी अनिवार्य केलेली परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. ती परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास सर्व रक्कम वसूलपात्र असेल, असे हमीपत्र (BOND) विद्यार्थ्यांकडून घेऊन, त्याप्रमाणे कार्यवाही करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहील.

५. परदेशातील पद्व्युत्तर पदवी किंवा पीएचडी पदवी विहित कालावधीत विद्यार्थ्यांने पूर्ण करणे आवश्यक आहे.

६. विद्यार्थ्याने परस्पर शैक्षणिक संस्था, विद्यापीठ अथवा अभ्यासक्रम अथवा ज्या ठिकाणी शिक्षण घेण्यासाठी त्यास मान्यता दिलेली आहे, ते ठिकाण बदलल्यास शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णत: वसूल करण्यात येईल.

७. (अ) ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी प्रथम वर्षाचे अथवा ज्यांना द्वितीय वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर झाली आहे त्यांना द्वितीय वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी थेट विद्यापीठास अदा करावी.

(ब) त्यानंतरच्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती आणि विद्यार्थ्याच्या प्रगती अहवाल प्राप्त करुन त्यानुसार आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधीत वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्ती रक्कम संबंधीत विद्यापीठास अदा करावी.

८. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक

योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्या अंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांनी परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करतांना शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दिनांक १५.०७.२०१० व शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१०/प्र.क्र.८२/शिक्षण-१, दिनांक१२.०९.२०१४ तसेच शासन निर्णय क्रमांक इबीसी २०१५/प्र.क्र.६९/ शिक्षण-१, दिनांक १६.०६.२०१५ मधील तसेच वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील अटी व शर्तीचे पालन करावे. त्याचप्रमाणे प्रस्तुत प्रकरणी कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची संपूर्ण जाबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१३११३६४८८१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=SJ And SA, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2016.12.15 11:01:41 +05'30'

**( चंद्रकांत ह.वडे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
६. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
१०. संबंधीत विद्यार्थी (समाजकल्याण आयुक्तालय, पुणे मार्फत).
११. उपसचिव (अर्थसंकल्प)/(विघयो), सा.न्या.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई
१२. उपसचिव (शिक्षण-१), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव (शिक्षण-१), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. शिक्षण -१ (निवडनस्ती)

(शासन निर्णय क्रमांक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. इबीसी २०१६/प्र.क्र.३४४/शिक्षण-१, दिनांक १३ डिसेंबर,२०१६ सोबतचे सहपत्र)

## प्रपत्र - अ

## पदव्युत्तर पदवी - कला व वाणिज्य (P.G. Art & Commerce)

### सन २०१६-१७ करीता अनुसुचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती- निवड यादी

| अ. क्र | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | QS World Ranking | अभ्यास क्रम | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रमाचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | प्रतिक मिलींद धोंगडे | Australian National University, Australia | 19 | Master | Master of Engineering in Digital System & Telecommunication | २ वर्ष |
| २ | डॉ.हेमंत ज्ञानदेव केमकर | Manchester University U.K. | 33 | Master | Master of Science Oral Surgery | ३ वर्ष |
| ३ | अंशुल प्रभाकर वाळके | University of New South wales, Sydney, Australia | 46 | Master | Master of Manufacturing Engineering & Management | २ वर्ष |
| ४ | तुषार देविदास डाहाट | University of Birmingham, U.K | 76 | Master | MBA Business Administration | २ वर्ष |
| ५ | प्रविण पंजाबराव खोब्रागडे | University of Birmingham, U.K | 76 | Master | MSc Structural Engineering & Practice | १ वर्ष |
| ६ | नितीन महादेव शिंदे | Cardiff University, UK | 122 | Master | MSc Wireless & Microwave Communication Engineering | १ वर्ष |
| ७ | मिलिंद दत्ता अहिवळे | University of Southampton, UK | 81 | Master | MSc in Finance | १ वर्ष |
| ८ | प्राची भाऊसाहेब बल्लाळ | University of Leeds, UK | 87 | Master | MSE Embedded Systems Engineering | १ वर्ष |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९ | मिहीर शिरीष आबनावे | Indiana University Purdue University USA | 89 | Master | M.S. in Human computer interaction | २८ महिने |
| १० | प्रेरणा कुणाल डावरे | The University of Western Australia | 98 | Master | Master of Applied Finance | २ वर्ष |
| ११ | अक्षय अनिल सातपुते | Cardiff University U.K | 122 | Master | MSC Structural Engineering | १ वर्ष |
| १२ | हर्षवर्धन बबन कांबळे | Cardiff University U.K | 122 | Master | Master of Science Wireless & Microwave Communication Engineering | १ वर्ष |
| १३ | पुरुषोत्तम चंद्रकांत कापसे | Cardiff University, | 122 | Master | MBA | १ वर्ष |
| १४ | करण अरुण बारामते | Cardiff University U.K | 122 | Master | MSc Advanced Mechanical Engineering | १ वर्ष |
| १५ | डॉ.प्राजक्ता शंकर खैरकर | University of Aberdeen, U.K | 137 | Master | Master of Public Health | १ वर्ष |
| १६ | पायल सुखदेव कांबळे | University of Illinois Chicago, USA | 185 | Master | Computer Systems Analysis | २ वर्ष |
| १७ | स्मिता बाबुलाल रंगारी | University of Canterbury, New Zealand | 211 | Master | Post Graduate Diploma in Business | १ वर्ष |
| १८ | सचिन बाबु शेळके | University of Strasbourg, France | 241 | Master | M.S. in Computational Mechanics | २ वर्ष |
| १९ | क्षितीजा गणेश जाधव | Cardiff University, UK | 122 | Master | MSc in Advanced Mechanical Engineering | १ वर्ष |
| २० | अश्विनी गुरुदेव वैद्य | University of South Australia | 288 | Master | Master of Engineering Telecommunication | २ वर्ष |
| २१ | हर्षद संदिपान आरडे | University of Colorado Denver, USA | 190 | Master | Master of Science in Information System | २ वर्ष |

(शासन निर्णय क्रमांक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. इबीसी २०१६/प्र.क्र.३४४/शिक्षण-१, दिनांक १३ डिसेंबर, २०१६ सोबतचे सहपत्र)

## प्रपत्र - ब

## पी.एच.डी

### सन २०१६-१७ करिता अनुसुचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती- निवड यादी

| अ.क्र | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | QS World Ranking | अभ्यासक्रम | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रमाचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | शिलराज अशोकराव कोल्हे | University of Queensland, Australia | 46 | PhD | Master of Philosophy (PhD) | ४ वर्ष |
| २ | अर्चना मनिष घोडेस्वार | Georgia Institute of Technology, Atlanta, USA | 84 | PhD. | M.A. in Economics Development (PhD) | ४ वर्ष |